**समग्र शिक्षा अभियानांतर्गत शिक्षक शिक्षण (Teacher Education) या केंद्रपुरस्कृत योजनेंतर्गत सन २०२०-२०२१ या वित्तीय वर्षासाठी केंद्र हिस्सा व राज्य हिस्सा वितरीत करण्यास मान्यता देणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग**
**शासन निर्णय क्रमांक: निधिवि-२०२०/प्र.क्र.४५/प्रशिक्षण**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दिनांक : ९ जून, २०२०

वाचाः-१) मानव संसाधन विकास मंत्रालय,भारत सरकार यांचे पत्र क्र.७-२/२०२०- IS.१२(GEN), दि.२७ एप्रिल,२०२०.

२) वित्त विभाग,शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०२०/प्र.क्र.६४/अर्थ-३,दि.१६/०४/२०२०

३) वित्त विभाग,शासन निर्णय क्र.अर्थसं-२०२०/प्र.क्र.६५/अर्थ-३,दि.०४/०५/२०२०

४) वित्त विभाग,शासन परिपत्रक क्र.संकीर्ण-१०१८/प्र.क्र.४६/अर्थोपाय,दि.१८/०५/२०२०

५) राज्य शैक्षणिक संशोधन व प्रशिक्षण परिषद, महाराष्ट्र यांचे पत्र क्र. सेवापूर्व शिक्षण-१(३)(अनु.वितरण)/२०२०-२१/को-१, दि.१९/५/२०२०

**प्रस्तावनाः-**

समग्र शिक्षा अभियानांतर्गत शिक्षक शिक्षण (Teacher Education) ही योजना केंद्र पुरस्कृत योजना असून या योजनेसाठी केंद्र शासन ६०% व राज्य शासन ४०% निधी उपलब्ध करून देते. त्यानुसार या योजनेसाठी सन २०२०-२०२१ या वित्तीय वर्षासाठी केंद्र शासनाने संदर्भाधीन दि. २७ एप्रिल, २०२० रोजीच्या पत्रान्वये ( General Head ) सर्वसाधारण लेखाशीर्षाखाली केंद्र शासन हिस्सा (६० टक्के) रू.५,५१,१४,०००/-इतके तदर्थ अनुदान वितरीत केले आहे.त्या अनुषंगाने संचालक,राज्य शैक्षणिक संशोधन व प्रशिक्षण परिषद, महाराष्ट्र यांनी संदर्भाधीन दि.१९ मे, २०२० रोजीच्या पत्रान्वये केंद्र शासनाचा हिस्सा रू.५,५१,१४,०००/- व त्यास समरूप राज्य शासनाचा हिस्सा (४० टक्के) रू.४,९७,३३,०००/- अशी एकूण रू.१०,४८,४७,०००/- इतकी तरतुद वितरीत करण्याची विनंती केली होती. त्याअनुषंगाने शासनाने खालीलप्रमाणे निर्णय घेतला आहे.

**शासन निर्णयः-**

राज्यातील जिल्हा शिक्षण व प्रशिक्षण संस्थेतील नियमित शिक्षकांच्या वेतनासाठी व ज्यांचे वेतन सेवार्थ प्रणालीमधून होते त्यावरील खर्च भागविण्यासाठी ०१, वेतन या उद्दिष्टाखाली अर्थसंकल्पीत

केलेल्या तरतुदीपैकी रु. ८,१०,००,००० /- ( रुपये आठ कोटी दहा लाख फक्त ) इतकी तरतुद वितरीत करण्यास मान्यता देण्यात येत आहे. सदर रक्कमा खाली नमूद केलेल्या लेखाशीर्षातंर्गत अर्थसंकल्पीत करण्यात आलेल्या तरतुदीमधून वितरीत करण्यात येत आहेत.

**(General Head) सर्वसाधारण लेखाशीर्ष**

| **उद्दिष्ट** | **वितरीत करावयाची तरतुद** | | **एकूण** |
|---|---|---|---|
| | **केंद्र हिस्सा (२२०२।६२१)** | **राज्य हिस्सा (२०२०।६१२)** | |
| **वेतन** | ४,८०,००,००० | ३,३०,००,००० | ८,१०,००,००० |

२. उपरोक्त खर्च मागणी क्र. ई-२,२२०२, सर्वसाधारण शिक्षण १०६, शिक्षक आणि इतर सेवा , (००) (००) (०१) समग्र शिक्षा अभियान (२२०२ । ६१२ ) सर्वसाधारण, (राज्य हिस्सा ४० टक्के) व मागणी क्र. ई-२,२२०२, सर्वसाधारण शिक्षण १०६, शिक्षक आणि इतर सेवा , (००) (००) (०२) समग्र शिक्षा अभियान (२२०२ । ६२१) सर्वसाधारण, (केंद्र हिस्सा ६० टक्के) या लेखाशीर्षाखालील मंजूर तरतुदीतून भागविण्यात यावा.

३. सदर ०१ वेतन या उद्दिष्टाखालील तरतुद, नियंत्रक अधिकारी म्हणून आयुक्त, शिक्षण यांच्या अधिनस्त ठेवण्यात येत आहे. सदर खर्च वित्त विभागाच्या १६ एप्रिल २०२०, ४ मे २०२० व १८ मे २०२० च्या शासन निर्णय / परिपत्रकातील सूचनांनुसार करण्यात यावा.

दुरध्वनी, वीज व पाणी, प्रवास खर्च, कार्यालयीन खर्च यासाठी केंद्र शासनाने वितरीत केलेली तरतुद व त्यास अनुरुप राज्य शासनाच्या हिस्याची तरतुद वित्त विभागाच्या मान्यतेनंतर वितरीत करणेबाबतचा शासन निर्णय स्वतंत्रपणे निर्गमित करण्यात येईल. सदर वितरीत करण्यात येणारी तरतुद राज्य प्रकल्प संचालक, समग्र शिक्षा यांच्या अधिनस्त ठेवण्यात येईल. सदर खर्चासाठी नियंत्रक अधिकारी म्हणून उप सचिव शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय हे असतील तर आहरण व संवितरण अधिकारी म्हणून अवर सचिव ( रोखशाखा ), शालेय शिक्षण व क्रीडा विभाग हे असतील.

४. खर्चासंबंधीच्या सध्याच्या शासकीय धोरणास अनुसरुन मंजूर आराखड्यानुसार याच वर्षात सदर वितरीत निधी खर्च होईल याची दक्षता घ्यावी. तसेच सदर खर्चाचा अहवाल, उपयोगिता प्रमाणपत्र इत्यादींची माहिती प्रत्येक महिन्याच्या १० तारखेपर्यंत राज्य प्रकल्प संचालक , समग्र शिक्षा व शालेय शिक्षण व क्रीडा विभागास आयुक्त, शिक्षण व संचालक, राज्य शैक्षणिक संशोधन व प्रशिक्षण

परिषद, महाराष्ट्र, यानी पाठवावी. सदर खर्च समग्र शिक्षा अभियान कार्यालयाच्या लेख्यांमध्ये प्रतिबिंबित होणे आवश्यक असल्याने या लेखाशीर्षाखालील जमा व खर्च याची माहिती समग्र शिक्षा अभियान कार्यालयाने Public Finance Management System (PFMS ) या प्रणालीवर नोंदवावी.

५. सदर शासन निर्णय अनौपचारिक संदर्भ क्र.७६७/२०२०/व्यय-५ दि. ८ जून, २०२० यांच्या मान्यतेने निर्गमित करण्यात येत आहे.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेतांक २०२००६०९१४२९३५४४२१ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Rajendra Shankarrao Pawar

Digitally signed by Rajendra Shankarrao Pawar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=School Education and Sports Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=679184b88f7019ef64ad6ddc2495ca280267c0d4755ce63fa70c45cf755d9373, cn=Rajendra Shankarrao Pawar
Date: 2020.06.09 16:30:33 +05'30'

**( राजेंद्र पवार )**
**उप सचिव,महाराष्ट्र शासन**

**प्रत-**

१. मा. राज्यपाल, महाराष्ट्र राज्य यांचे सचिव.
२. मा. मुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. मा. उपमुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई.
४. मा. मंत्री (शालेय शिक्षण), यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
५. मा. राज्यमंत्री (शालेय शिक्षण ), यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
६. अपर मुख्य सचिव (शालेय शिक्षण व क्रीडा विभाग ) यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
७. आयुक्त (शिक्षण) महाराष्ट्र शासन, पुणे
८. राज्य प्रकल्प संचालक, समग्र शिक्षा अभियान, चर्नीरोड, मुंबई.
९. संचालक (माध्यमिक व उच्च माध्यमिक) महाराष्ट्र राज्य, पुणे
१०.संचालक (प्राथमिक) महाराष्ट्र राज्य, पुणे.
११.संचालक, राज्य शैक्षणिक संशोधन व प्रशिक्षण परिषद, महाराष्ट्र राज्य, पुणे
१२.संचालक (प्रौढ व अल्पसंख्याक) महाराष्ट्र राज्य, पुणे
१०.महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र (१/२), मुंबई/नागपूर
११.महालेखापाल (लेखा परिक्षा), १/२, महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर.
१२.सर्व प्राचार्य, जिल्हा शिक्षण व प्रशिक्षण संस्था (DIET)

१३.सर्व जिल्हा कोषागार अधिकारी
१४.नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.
१५.वित्त विभाग (व्यय-५/अर्थसंकल्प-८), मंत्रालय, मुंबई.
१६.कक्ष अधिकारी (अर्थसंकल्प), शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, मंत्रालय, मुंबई यांनी मंजूर रक्कम बी.डी.एस.प्रणालीवर तात्काळ उपलब्ध करुन द्यावी.
१७.निवडनस्ती (प्रशिक्षण)